**आर्थिक वर्ष २०२३ अखेर मार्च महिन्यात सर्व प्रशासकीय विभाग तसेच अधिदान व लेखा कार्यालय/ कोषागारे/ उपकोषागारे यांनी करावयाच्या कार्यवाहीबाबत सूचना**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र.- संकीर्ण -२०२३/प्र.क्र.२७/२०२३/कोषा प्रशा-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १५ मार्च, २०२३.

**शासन परिपत्रक**

दरवर्षी मार्च महिन्यात अर्थसंकल्पीय अधिवेशनात पूरक मागणीद्वारे व सुधारीत अंदाजपत्रकाद्वारे विविध विभागांना निधी उपलब्ध करुन दिला जातो. सदर उपलब्ध झालेला निधी दि. ३१ मार्च अखेर कोषागार / उपकोषागार तसेच अधिदान व लेखा कार्यालय येथे देयके सादर करुन खर्च करणे अनिवार्य असल्यामुळे अधिदान व लेखा कार्यालय तसेच कोषागार / उपकोषागार कार्यालयात मार्च महिन्यात सादर होणा-या देयकांच्या संख्येत मोठ्या प्रमाणात वाढ होते. त्यामुळे ट्रेझरी नेट, बिम्स व सेवार्थ इ. प्रणालींवर ताण येऊन त्या खंडीत होण्याचे व वेग मंदावण्याचे प्रकार घडतात. तसेच देयकांची तपासणी करण्यास पुरेसा कालावधी मिळत नाही. याशिवाय उपकोषागार स्तरावर रात्री उशिरा सादर होणारी देयके, बँकेच्या कामाच्या वेळांमुळे पारित करता येत नाहीत. अशा प्रकारे मार्च अखेर नेहमी उद्भवणाऱ्या अडचणींवर मात करण्यासाठी सर्व प्रशासकीय विभाग त्यांच्या अधिनस्त सर्व कार्यालये, आहरण व संवितरण अधिकारी तसेच अधिदान व लेखा कार्यालय/सर्व कोषागारे / उपकोषागारे यांनी खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

१) **दि. ३१ मार्च, २०२३ रोजी अधिदान व लेखा कार्यालय तसेच कोषागार / उपकोषागार कार्यालयातील देयके स्वीकृती व प्रदानाचे काऊंटर उशीरापर्यंत सुरु ठेवणेबाबत :-**

मार्च अखेरीस दि ३१ मार्च, २०२३ रोजी शासनाचा निधी अखर्चित राहू नये यासाठी अधिदान व लेखा कार्यालय, तसेच जिल्हा कोषागार कार्यालये व उपकोषागार कार्यालये दि ३१ मार्च, २०२३ रोजी रात्री उशिरापर्यंत चालू ठेवण्यात येतील. त्यामुळे सदर दिवशी देयके स्वीकृती व ईसीएस/एनईएफटी/ सीएमपी/ ई-कुबेर (ECS/NEFT/CMP/e-kuber) प्रदानाची कामे पूर्ण करता येतील..

२) **दि. ३१ मार्च, २०२३ रोजी शासकीय प्रदाने धनादेशा द्वारे करण्यास मंजूरी देणे :-**

दि. ३१ मार्च, २०२३ रोजी मुंबई व नागपूर येथील भारतीय रिझर्व्ह बँक, भारतीय स्टेट बँक तसेच शासनाचे आर्थिक व्यवहार हाताळणाऱ्या अन्य बँकाच्या शाखा रात्री उशिरापर्यंत सुरु राहिल्या तरी रात्री १२.०० नंतर बँकांच्या संगणकीय प्रणालीतील दिनांकात बदल होत असल्याने, व्यवहार पुढील दिनांकास नोंदविला जातो. त्यामुळे शासकीय व्यवहारांचे अचूक लेखांकन होण्याकरीता भारतीय रिझर्व्ह बँक यांच्या दि. २५ फेब्रुवारी, २०२३ च्या पत्रान्वये प्राप्त निर्देशानुसार अधिदान व लेखा कार्यालय, कोषागार / उपकोषागार कार्यालयांनी खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

२.१) **ई-कुबेर कार्यपध्दती प्रदानासंदर्भात अधिदान व लेखा कार्यालय, कोषागार / उपकोषागार कार्यालयाने करावयाची कार्यवाही** :-

(अ) अधिदान व लेखा कार्यालय, वरिष्ठ कोषागार कार्यालय, नागपूर , कोषागार कार्यालय, अकोला यांनी दि.३१ मार्च, २०२३ रोजी सायं. ६.०० वाजेपर्यंत ई-कुबेर प्रणालीद्वारे प्रदान करण्याची कार्यवाही करावी. दि. ३१ मार्च, २०२३ रोजी सायं. ६.०० नंतर धनादेशापर्यंत प्रदान करण्यात यावे.

[१]आहरण व संवितरण अधिकारी यांनी ई-कुबेर प्रणालीद्वारे करण्यात आलेल्या प्रदानास रात्रौ ८.०० वाजेपर्यंत मान्यता (Approval) देण्याची कार्यवाही पूर्ण करावी.

[२] आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर प्रदानास विहित मुदतीत मान्यता दिल्याची खातरजमा अधिदान व लेखा कार्यालय व कोषागार/उपकोषागार कार्यालयाने करावी.

[३] आहरण व संवितरण अधिकारी यांचे मान्यते अभावी प्रदान न झाल्यास अनुदान व्यपगत झाल्यास त्याची जबाबदारी अधिदान व लेखा कार्यालयाची व संबंधित कोषागार / उपकोषागार कार्यालयाची राहणार नाही.

(ब) **ज्या उपकोषागारामध्ये ई-कुबेर प्रणाली सुरु करण्यात आलेली आहे अशा उपकोषागारांनी दि. ३१ मार्च, २०२३ रोजी दुपारी ४.०० वाजेपर्यंत ई-कुबेर प्रणालीद्वारे प्रदान करण्याची कार्यवाही करावी.**

[१]आहरण व संवितरण अधिकारी यांनी ई-कुबेर प्रणालीद्वारे करण्यात आलेल्या प्रदानास सायं.६.०० वाजेपर्यंत मान्यता (Approval) देण्याची कार्यवाही पूर्ण करावी.

[२] आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर प्रदानास विहित मुदतीत मान्यता दिल्याची खातरजमा उपकोषागार कार्यालयाने करावी.

[३] आहरण व संवितरण अधिकारी यांचे मान्यतेअभावी प्रदान न झाल्यास, अनुदान व्यपगत झाल्यास त्याची जबाबदारी उपकोषागार कार्यालयाची राहणार नाही.

२.२) <u>CMP/Fast Plus CMP द्वारे प्रदाने हाताळणाऱ्या कोषागार कार्यालयाने करावयाची कार्यवाही.</u>

[१] कोषागार कार्यालयाने दि. ३१ मार्च, २०२३ रोजी सायं ४.०० पर्यंत सर्व प्रदाने CMP प्रणालीद्वारे करावयाची आहेत. तद्नंतर सर्व प्रदाने धनादेशाद्वारे करावयाची आहेत.

[२] दि.३१ मार्च, २०२३ रोजी सायं. ४.०० पर्यंत CMP प्रणालीद्वारे केलेल्या सर्व प्रदानांना आहरण व संवितरण अधिकारी यांनी विहित मुदतीत मान्यता दिल्याची खातरजमा कोषागार कार्यालयाने करावयाची आहे.

[३] आहरण व संवितरण अधिकारी यांचे मान्यतेअभावी प्रदान न झाल्यास, अनुदान व्यपगत झाल्यास सदरची जबाबदारी कोषागार कार्यालयाची राहणार नाही.

२.३) <u>आर्थिक वर्ष २०२३ अखेर मार्च महिन्यात Real Time Voucher Generation at Sub Treasury level प्रणाली तसेच CMP / SBI Fast Plus प्रदान पध्दती लागू असलेल्या उपकोषागारांनी करावयाच्या कार्यवाहीबाबत.</u>

[१] उपकोषागारामध्ये Real Time Voucher Generation at Sub Treasury level ही प्रणाली तसेच CMP किंवा SBI Fast Plus प्रदान पध्दती लागू केलेली आहे . यास्तव उपकोषागारात बँक मुखांकन (Bank Advise) द्वारे प्रदान करता येऊ शकणार नाही. सदर वस्तुस्थिती विचारात घेता, दि. ३१ मार्च, २०२३ रोजी सायं ६.०० पर्यंत देयके स्वीकारुन पारित देयकांचे प्रदान रात्रौ. ८.०० पर्यंत CMP प्रणालीद्वारे करावयाचे आहे.

[२] उपकोषागार कार्यालयाने दि. ३१ मार्च, २०२३ पर्यत सर्व प्रदाने CMP प्रणालीद्वारे करावयाची आहेत.

[३] दि.३१ मार्च, २०२३ पर्यंत CMP प्रणालीद्वारे केलेल्या सर्व प्रदानांना आहरण व संवितरण अधिकारी यांनी विहित मुदतीत मान्यता दिल्याची खातरजमा उपकोषागार कार्यालयाने करावयाची आहे.

[४] आहरण व संवितरण अधिकारी यांचे मान्यतेअभावी प्रदान न झाल्यास, अनुदान व्यपगत झाल्यास सदरची जबाबदारी उपकोषागार कार्यालयाची राहणार नाही.

३) **<u>कोषागाराकडून यापूर्वी आक्षेपित देयके दि.१७ मार्च २०२२ पूर्वी अधिदान व लेखा कार्यालय, कोषागार/उपकोषागार कार्यालयात सादर करणे :-</u>**

(अ) माहे एप्रिल २०२२ ते फेब्रुवारी, २०२३ या कालावधीत कोषागारांनी आक्षेपित केलेली देयके आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडून वर्षाअखेरीस कोषागारात सादर केली जातात. आर्थिक

वर्षाखेरीस देयकांचा ओघ पाहता अशा देयकांची काटेकोर तपासणी करणे कोषागार अधिकाऱ्यांना वेळेअभावी शक्य होत नसल्याने त्यात अनियमितता घडू शकतात. त्यामुळे कोषागारांकडून यापूर्वी आक्षेपित झालेली दीर्घ काळापासून कोषागारात पुन्हा सादर न केलेली सर्व देयके सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांनी दि.१७ मार्च २०२३ पर्यंतच अधिदान व लेखा कार्यालय / कोषागार / उपकोषागार कार्यालयात सादर करावीत. त्यांनतर अशा प्रकारची देयके स्विकारली जाणार नाहीत.

(ब) प्रशासकीय विभागांकडे उपलब्ध असलेल्या अनुदानाची खालील बाबींची देयके दि.१७ मार्च, २०२३ पर्यत अधिदान व लेखा कार्यालये, कोषागार /उपकोषागार कार्यालयात सादर करण्यात यावीत.

१. प्रवास भत्ता देयके.

२. आस्थापना विषयक पुरवणी देयके.

३. वैदयकीय खर्च प्रतिपूर्ती देयके.

त्यानंतर अशी देयके पुढील वर्षाच्या अनुदानातून काढण्यात यावीत.

पुरवणी मागण्या (मार्च -२०२३) व सुधारीत अंदाजपत्रकानुसार उपरोक्त बाबींसाठी मंजूर झालेल्या अनुदानाचीच देयके दि १७ मार्च, २०२३ नंतर कोषागारात स्वीकारण्यात येतील.

४) <u>प्रपत्र बिजक (Proforma Invoice ) जोडून सादर होणा-या देयकांबाबत :-</u>

मार्च महिन्याच्या अखेरीस उपलब्ध निधी खर्च करण्याचे हेतूने माल/वस्तू प्राप्त झालेल्या नसताना प्रपत्र बिजक (Proforma Invoice ) जोडून देयके सादर केली जातात. वित्त विभाग, शासन परिपत्रक दि १४ मार्च, २०१८ अन्वये अधिदान व लेखा कार्यालय, कोषागार / उपकोषागार कार्यालयांनी याबाबत कशाप्रकारे कार्यवाही करावी याचे निर्देश देण्यात आलेले आहेत. महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम ३०२ व ३०३ तसेच महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५ मधील परिशिष्ट १ मधील विवरणपत्र २ मध्ये नमूद केलेल्या बाबींसाठीच संक्षिप्त देयकांवर रकमा काढता येतील.

अ) महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ नमुना २८ अथवा ३१ मध्ये प्रपत्र बिजक ( Proforma Invoice ) जोडून देयके सादर केली असतील तर अशी देयके पारित करण्यात येऊ नयेत.

ब) पुरवठादाराकडून खरेदी केलेल्या वस्तुंचा पुरवठा करण्यात आला असेल व महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८, नमुना २८ अथवा ३१ सोबत अंतिम देयक ( Final Bill ) /नियमित प्रमाणके / पावत्या जोडल्या असतील तरच देयके पारित करावीत.

५) <u>जिल्हा कोषागार स्तरावर सादर होणे आवश्यक असणारी देयके उपकोषागार स्तरावर सादर न करणे :-</u>

सुधारीत अंदाजपत्रक व पुरवणी मागणीद्वारे प्राप्त अनुदानातून वैयक्तिक लाभाची मोठया रकमेची देयके महसूल विभाग, कृषी विभाग, आदिवासी विकास विभाग, सार्वजनिक आरोग्य विभाग इ. कार्यालयाकडून तालुका स्तरावर अनुदान वाटप करुन उपकोषागार कार्यालयामध्ये वर्ष अखेरीस सादर केली जातात. उपकोषागार स्तरावर एकच लिपीक व एकच सहायक लेखाधिकारी / उपलेखापाल कार्यरत असल्यामुळे अशा देयकांची छाननी करण्यावर मर्यादा येतात व अनियमितता घडण्याचा संभव असतो. त्यामुळे अशी देयके उपकोषागार कार्यालयात सादर न करता जिल्हा कोषागार कार्यालयामध्येच सादर करण्यात यावीत. उपकोषागार स्तरावरील सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांना याबाबत लेखी स्वरुपात सूचना द्याव्यात.

६) <u>उपकोषागारामध्ये दि. ३१ मार्च, २०२३ रोजी सांयकाळी ०६.०० नंतर देयके स्वीकृती बंद करुन जिल्हा कोषागारात देयके सादर करणे :-</u>

उपकोषागारात प्राप्त होणारी देयके, त्या देयकांवर उपकोषागाराकडून करावयाच्या कार्यवाहीस लागणारा अवधी व बँकेच्या कामाचा कालावधी पाहता उपकोषागारात दि. ३१ मार्च, २०२३ रोजी सांय.६.०० नंतर देयके स्वीकृती बंद करण्यात येईल. दि. ३१ मार्च, २०२३ रोजी सांय. ६.०० नंतर कोकण भवन, उपकोषागार कार्यालय वगळता इतर उपकोषागार कार्यकक्षेतील आहरण व संवितरण अधिकारी यांनी त्यांचे

जिल्हा स्तरावरील आहरण व संवितरण अधिकारी यांचे मार्फत जिल्हा कोषागारात देयके सादर करावी. याबाबत सर्व उपकोषागारामध्ये सूचना फलकाद्वारे सूचना देण्यात याव्यात.

**(७) <u>नियंत्रक अधिकाऱ्यांनी पुरवणी मागणीद्वारे प्राप्त अनुदान त्वरीत बिम्स (BEAMS) प्रणालीवर उपलब्ध करुन देणे</u> :-**

शासनाकडून विविध विभागांना आठमाही सुधारीत अंदाजपत्रकानुसार तसेच पुरवणी मागण्यांद्वारे अनुदान मंजूर केल्यानंतर प्रशासनिक विभाग व विभाग प्रमुखांकडून बिम्स (BEAMS) प्रणालीवर उशिराने आहरण व संवितरण अधिका-यांना अनुदान उपलब्ध करुन दिले जाते, त्यानंतर देयके तयार करणे, उपकोषागारात सादर करणे इत्यादी कार्यवाही करण्यास विलंब होतो. वाढीव भारामुळे दि. ३१ मार्च रोजी बिम्स (BEAMS) प्रणाली तसेच ट्रेझरी नेट प्रणाली यावर अतिरिक्त ताण येऊन या प्रणाली खंडीत होण्याचे प्रसंग उद्भवतात. त्याकरीता सर्व विभाग/नियंत्रण अधिकारी यांनी सुधारीत अर्थसंकल्प / पुरवणी मागणीद्वारे प्राप्त अनुदान बिम्स (BEAMS) प्रणालीवर त्वरीत उपलब्ध करुन देण्यात यावे.

**८) <u>विभागीय सहसंचालक यांनी मार्च महिन्यातील कामकाजाच्या अनुषंगाने करावयाची कार्यवाही</u> :-**

अ. विभागीय सहसंचालक कार्यालयांनी माहे मार्च मध्ये कोषागारातील कामकाजाच्या अनुषंगाने शासन तसेच संचालनालय स्तरावरुन प्राप्त होणा-या सुचना, परिपत्रके, शासन निर्णय यांची अंमलबजावणी कोषागार / उपकोषागार स्तरावर होईल याद्दष्टीने नियंत्रण ठेवावे.

आ. विभागीय सह संचालक कार्यालयाचे अधिनस्त कोषागार कार्यालयातील रिक्त पदांचा आढावा घेण्यात यावा व ज्या कोषागारात कामकाज करण्यासाठी मनुष्यबळ अपुरे पडत असेल अशा ठिकाणी शक्य तेथे नियोजन करुन सह संचालक स्तरावरील कर्मचारी उपलब्ध करुन देण्यात यावेत.

इ. मार्च महिन्यातील कामाचा निपटारा करण्यासाठी कोषागार / उपकोषागार कार्यालयांतील अधिका-यांची आढावा बैठक आयोजित करण्यात यावी व त्यानुषंगाने कोषागार कार्यालयांनी मांडलेल्या समस्यांच्या अनुषंगाने मार्गदर्शन व उपाययोजना करण्यात यावी.

ई. मार्च अखेरीस केल्या जाणा-या कोषागारातील कामकाजावर सह संचालक कार्यालयांमार्फत नियंत्रण ठेवण्यात यावे व त्याचा प्रगती अहवाल संचालनालय, लेखा व कोषागारे कार्यालयास वेळोवेळी सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून,त्याचा संकेतांक २०२३०३१५१९०७४५७४०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

YOGITA RAJENDRA GAWTHE

Digitally signed by YOGITA RAJENDRA GAWTHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=52b0a7a929e15df371e19925d72c74750893ae3c38fb361aae4ddf29813ec025, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0EE6E49CD62C67ABCCF3982609A7A3BA055E694F467A2A382468381FF550D5EB, cn=YOGITA RAJENDRA GAWTHE
Date: 2023.03.15 19:15:10 +05'30'

**(योगिता गावठे)**
**कार्यासन अधिकारी, वित्त विभाग**

**प्रत,**

१.मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२.सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य,
३.मा.राज्यपाल यांचे सचिव
४.मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५.मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
५.सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७.मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख

८.प्रबंधक, मुळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९.प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११.महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१४.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१
१५.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७.सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८.प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२.सर्व विभागीय आयुक्त
२३.सर्व जिल्हाधिकारी
२४.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२५.संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२७.सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नाशिक /औरंगाबाद/ अमरावती /नागपूर
२८.संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण भवन, नवी मुंबई
२९.सहसंचालक,स्थानिक निधी लेखापरीक्षा मुंबई /पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती /नागपूर
३०.वित्त विभागातील सर्व कार्यासने
३१.निवड नस्ती कोषा प्र.५.